महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळाच्या बळकटीकरणासाठी वर्ष २०२४-२५ मध्ये अनुदान वितरित करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः वक्फ २०२४/प्र.क्र.७७/का.४**

मादाम कामा रोड, राजगुरु हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख : १०.०६.२०२४

**वाचा-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२४/प्रक्र. ३४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल, २०२४
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ यांचे पत्र क्रमांक: मरावमं/ आस्थापना/ शा.अनु/रजि.क्र.५०८/२६०८/२०२४, दि.१६.०४.२०२४

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाने वक्फ विषयाकरिता गठित केलेल्या संयुक्त संसदीय समितीने दि.१८/०६/२००७ ते दि.२२/०६/२००७ या कालावधीत महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळाच्या कामकाजाची तसेच वक्फ मालमत्तांची पाहणी करण्याकरिता महाराष्ट्र राज्यास भेट दिली होती. सदर भेटीच्या वेळी, शासनातर्फे महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळाला अनुदान उपलब्ध करुन देण्यात येईल, असे तत्कालीन मा.मुख्यमंत्री महोदयांनी आश्वासन दिले होते. त्यास अनुसरुन महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळाच्या बळकटीकरणासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीय अंदाजमध्ये रु.१०.०० कोटी इतकी तरतूद करण्यात आलेली आहे. सदर बाब विचारात घेता, मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ यांनी त्यांच्या संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये विनंती केल्यानुसार महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळाच्या बळकटीकरणासाठी अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

२. संदर्भ क्र. १ येथील परिपत्रक आणि नियोजन व वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळाच्या बळकटीकरणासाठी रु.२.०० कोटी (रुपये दोन कोटी मात्र) इतके अनुदान मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद यांना अदा करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद यांना सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेली रु.२.०० कोटी (रुपये दोन कोटी मात्र) इतकी रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरित करण्यास तसेच कोषागारात देयक सादर करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद यांनी खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी. त्यांनी सदर निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखाकार कार्यालयास सादर करावे.

४. वरीलप्रमाणे अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करतांना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/ शर्तीचे पालन करणे ही जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ यांची राहील.

५. उपरोक्त कारणासाठी येणारा खर्च "मागणी क्र.झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, १९९ इतर अशासकीय संस्थांना सहाय्यक (०१)(०१) महाराष्ट्र राज्य वक्फ बोर्डाला सहाय्यक अनुदान, ३१, सहाय्यक (२२३५ ए ७४१)" या लेखाशीर्षाखाली खर्च टाकण्यात यावा व तो सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीतूमधून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय नियोजन विभाग अनौ.संदर्भ क्र. २११/१४७१ दि.०७.०५.२०२४, वित्त विभाग अनौ.संदर्भ क्र. १३७/२०२४/व्यय-१, दि.२२.०५.२०२४ अन्वये प्राप्त मान्यता तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२४/प्रक्र. ३४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल, २०२४ अन्वये विभागांना प्रदान करण्यात आलेले अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६१०१४५६०३८४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MOHINUDDIN B TASHILDAR

Digitally signed by MOHINUDDIN B TASHILDAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7eac303551c8c1c40121e24c1d7fb18a03efe22c688ba9240e47d3c712ae3ea9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7E694259001AF4DCAD48B69EB7E39AFC9472E61C49FC40EB7D603AE236006903, cn=MOHINUDDIN B TASHILDAR
Date: 2024.06.10 15:09:32 +05'30'

**(मो. बा. ताशिलदार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
३. प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहाय्यक
४. उप सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहाय्यक
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, छत्रपती संभाजीनगर,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर,
७. उपसचिव (व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. अवर सचिव/कार्यासन अधिकारी (का-७/अर्थसंकल्प शाखा), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. निवडनस्ती/कार्यासन-४ संग्रहार्थ.